


# ऑटोरायटिंग अर्थात संचार लेखनाचे प्रात्यक्षिक




**वाचक हो, ऑटो रायटिंगवरील लेख वाचण्याच्या आधी खुलासा करू इच्छितो. सध्या ऑटोरायटिंग मी करतो परंतु ते माझ्यासाठी. या पेक्षा ऑटो रायटिंग घडते, ते फक्त माझ्या संदर्भात असे म्हणणे जास्त सयुक्तिक होईल. ... ते कसे घडते?... कोणाशी संपर्क होतो?**

**शेजारी लाल रंगातील दर्शवलेल्या चित्रकथीतून आशीर्वाद, इतर सांकेतिक चिन्हे येत राहतात. एरव्ही मी चित्रकलेत 'ढ' आहे.**



# जहाज मंदिरात ऑटोरायटींगचा उद्भव

## Osho's Message ... "Called Here to Inspire You...

जल मंदिर- कुंभोज








ॐकोल्हापुरातून आम्ही हातकणंगल्याच्या वाटेला लागलो. पुढील काही अंतरावर जयसिंगपुराजवळीत ओव्हरब्रिजवर घडलेल्या कै. फ्लाईंग ऑफिसर धनंजय मोटेच्या त्या भीषण करुणाजनक अपघात घटनेची आठवण येऊन मन विषण्ण झाले.

ॐकुंभोजकडे वळणावर बाहुबलीच्या मंदिराचा बोर्ड पाहिला व मागील आठवणींचा उजाळा मिळाला.

ॐ१९६५-६६चे साल असावे.... मी व अशोक भिडे माधवनगर ते बाहुबली सायकलवरून सहलीला आलो होतो. चिरंजीव चिन्मय व सून वरदा यांनी आखली होती.

ॐआम्ही बाहुबलीच्या संकुलात शिरलो. जहाज मंदिरातील रोषणाईचे कौतुक ऐकले होते. त्या ठिकाणी प्रथम जाणे झाले. आम्ही पोहोचताच अंतर २५-३० किमी असावे. त्यावेळी २८ फुट उंचीच्या बाहुबलीच्या पुतळ्याची स्थापना झाल्याचे वृत्त आले होते म्हणून कुतुहलाने आम्ही तेथे गेलो होतो...

ॐआताची सहल जणू आमची वाट पहात असल्या प्रमाणे विविध कारंजी उडू लागली व रोषणाई सुरु झाली. सर्व परिसर चैतन्याने फुलून गेला.

❖आम्ही जहाजाच्या आकारातील मंदिरात पोहोचलो. मी त्या पार्श्वनाथांच्या मुर्तीकडे पहात ध्यानस्थ झालो. काही काळ तसाच गेला असावा.

❖मी उठून प्रांगणात आलो तोवर बाकीचे माझी वाट पहात असलेले दिसले. काही बोलयच्या आत मी त्यांना हाताने थांबवत बोलू लागलो.

❖हात वारे नकळत तसे होत असल्याचे जाणवले. मी बोलू लागलो. सर्व स्बध झाले. मी हिंदीतून काही सांगत होतो. तो बहर २-३ मिनिटे राहिला. त्या नंतर शेवटी “आत्मन, ओशो” ! असे म्हणून सांगणे थांबले.

❖तो ट्रांन्स नंतर काही काळाने उतरला. मी काय सांगत होतो यावर चर्चा झाली. नक्की काय होतय याची कल्पना नसल्याने एकत्रपणे काही जे आठवले ते नोंद केले गेले. त्यातील काही वाक्ये अशी होती ...



**“अपनी अभिव्यक्ति को शब्दरुप में अंकित करने की प्रेरणा देने के लिए तुम्हे बुलाया गया। आगे आने वाले कार्य की रुपरेखा भी अगले कुछ काल में मिलेगी । उसे स्वीकार करने के लिए तुम्हे तय्यार किया जा रहा है।” ....**

**आत्मन, ओशो.”**

- माझ्या हातात त्यावेळी ऑटोरायटींगची वही नव्हती. अन्यथा त्याची लेखन नोंद झाली असती.
- प्रथमच असे उघड्यावर घरच्या सर्वांसमक्ष कथनाच्या रुपाने मी जे विचार व्यक्त केले ते महत्वाचे असावेत म्हणून मी नंतर एका चिठोऱ्यावर लिहिले.
- काही घटनानंतर त्या कथनाची महती हळूहळू कळून आज आणखी आठवण येत आहे. असे वाटून त्याला लिहून काढत आहे.
- भविष्य काळात आणखी काही घटनानंतर जे बोललो त्या कथनांची संगती आणखी कळून येईल....
- जून 2010...






# ऑटोरायटिंग गरजू लोकांसाठी बंद आहे...

ॐ वाचक हो, ऑटो रायटिंगवरील लेख वाचण्याच्या आधी

ॐखुलासा करू इच्छितो. सध्या ऑटोरायटिंग मी करतो परंतु ते माझ्यासाठी. या पेक्षा ऑटो रायटिंग घडते, ते फक्त माझ्या संदर्भात असे म्हणणे जास्त सयुक्तिक होईल.

ॐपूर्वी - साधारण २००४ ते २००६ पर्यंतच्या काळात ऑटो रायटिंग मधून गरजूंना त्यांच्या कारणांसाठी काही संदेश, आदेश, प्रेरक उतारे किंवा कधी कधी कानपिचक्या देणारे लेखननिर्माण होत असे. ते त्या त्या व्यक्तिंना पत्राने मी कळवीत असे.

ॐसोबत ऑटो रायटिंगचे त्या व्यक्तिला उद्देशूनसंदेश येत असत आलले लेखन व नाडी ग्रंथ भविष्य नावाचे पुस्तक किंमत ५० रू.सप्रेम भेट पाठवत असे. त्याला ही कारण होते. मोफतची किंमत रहात नाही. म्हणून काही फी जरूर घ्यावी. मात्र मोबदला घेऊन ऋणी राहू नये. असा ऑटो रायटिंग मधील आदेश पाळून रु. ५० मी घेत असे. बदल्यात ५० रू चे नाडी ग्रंथ भविष्याचे पुस्तक कुरीयरने-पोस्टाने पाठवत असे. असो.

ॐ कधी विवक्षित व्यक्तींच्या विचारणे बाबत मृत्य व्यक्ती उत्तर देऊ इच्छित नसे.तेव्हा लोक वैतागत वा मला त्याचा दोषी मानत. अशाच एकाने फोन वरून म्हटले,आम्हाला काही संदेश येतात / काही येत नाहीत. पण मग तुम्हाला काय येतात ? सध्या तुम्ही अन्यलोकांसाठी ऑटो रायटिंग बंद आहे असे म्हणता. मग तुमच्यासाठी जर ते चालू असेल तर ते काय असते ?प्रश्न तसा व्यक्तिगत होता. पण मला भावला.

ॐ ऑटोरायटिंगवरील लेख मी प्रसिद्ध केला. शेकड्यांनी विचारणा आल्या. गरजूंना संदेश मिळाले. एके दिवशी हे लेखन यापुढे इतरांसाठी नको असा आदेश मिळाला व मी थांबलो..

**Shashi, the divine is encouraging to unvail your innerself. Be alert. Keep fit and calm to undertake new phase of duties... For baba**

**Dear Parvardogar is the divine power. Dont worry. Be happy. Chant Digambara Mantra, as my blessings. Love Karl.**

**प्रिय वाचकांनो, आपल्या लक्षात आले असेल की जे कोणी ऑटोरायटिंग करतात त्यांच्या लेखनाचा मूळ हस्तलिखित नमुना ते दाखवत नाहीत. नेटवर शोधताना कधी कधी एखादे पान  दिसते. माझ्या संदर्भात मूळ हस्तलिखित कसे होते? ते आपल्याला पहायला मिळेल. शिवाय त्यात रेखाटलेली चित्रे किंवा आकृत्या चौकोनात दर्शवल्या आहेत. त्यातून काय गर्भित आहे तेही माझ्या समजुतीप्रमाणे लिहून ठेवले आहे. काही काळानंतर कोणाला यावर शोधकार्य करायला प्रेरणा मिळावी असा उद्देश आहे.**

DATE: / /
19

27 जानेवारी 2006

Dear Parvardigar is the divine power
Don't worry. Be Happy. Chant Digambar
a mantra, as my blessings. Love
Karl.

Shashi, the divine is encouragi
ng to unvail your inner self. Be alert
Keep fit and calm to undergo new
phase of duties.
for baba

# फक्त माझ्यासाठी
# ऑटोरायटिंग








- ❖"Someone is waiting for you on the bank of a river!"
- ❖कोणीतरी एका नदीच्या तिरावर वाट पहात आहे...
- ❖हे कथन केले होते पुज्य रमणी गुरुजींच्या हातातील तमिळ भाषेतील ताडपट्ट्यातील मजकुरातून. ते पुण्यात आले असताना काक भुजंदर नाडीग्रंथ वाचनातून नंतर ते इंग्रजी भाषेत संक्षिप्तात सांगतात महर्षी काय म्हणतात ते. ...
- ❖'कुठली नदी? कोण वाट बघत आहे? यावर प्रकाश टाकावा ही विनंती' मी म्हणालो.
- ❖पुज्य रमणी गुरुजी म्हणाले, "ते तुला योग्य वेळ आली की कळेल. आत्ता इतकेच लिहून आले आहे."
- ❖नंतर बराच काळ लोटला.

# फक्त माझ्यासाठी ऑटोरायटिंग

- ॐ या लेखनाच्यासंदर्भातून
- ॐ माझ्या आठवणी ताज्या व्हाव्यात आणि वाचकांना या आठवणींशी आपल्या संदर्भात घडलेल्या घटना आठवाव्यात.
- ॐ त्यातून रंगतदार नातेसंबंध निर्माण व्हावा असे वाटते.
- ॐ ज्या वेगवेगळ्या स्थानात ऑटोरायटिंग उद्भवले त्यातून कथासूत्र पुढे सरकेल.
- ॐ म्हणून काही वेळा लेखन काल पुढे मागे होईल. असो.

- ॐत्र्यंबकेश्वरच्या क्षेत्रात जायची इच्छा होती. बस मधून उतरलो. सहज फिरत चाललो होतो. एका ठिकाणी हरिपाठावर प्रवचन चालले असावे. लहानपणी अशी प्रवचने ऐकायचो. कुठे चालले आहे म्हणून तिकडे गेलो. मंदिरात जाऊन बसलो. लवकरच प्रवचन संपले. कीर्तनकारांच्या पायापडून मंदिरातील मूर्तीला नमस्कार केला. नंतर कळले की ते संत निवृत्तीनाथांच्या समाधीचे ते स्थान आहे. एका खांबाला टेकून बसलो असताना ऑटोरायटिंग करायला वाटले.
- ॐतिथे जे लिहिले होते त्यात "माझा भाऊ तुझी वाट पाहत आहे असे म्हटले गेले."
- ॐ 'मतीप्रकाश' पडला पूर्वी जे म्हटले होते यावर!
- ॐनंतर काय घडले ते सादर.










# त्र्यंबकेश्वर दि २९ मे २००६

# जावे त्र्यंबकेश्वरापाशी -
# सोमवारी बेल, 108 फुलांचा माला...

स नामजपाचा।
साधावी सोमवारी
शिवाची आराधना।
दीप लावून १०८ ची
माला - फुलांची, बेल
अभिषेकावे. रुद्रपाठ
करवावा। पौर्णिमेस
करून नमन सत्यदेवाला
पूर्वी संबोधले तसे
घडेल कार्याला.



कधी पारिवारिक कार्याला हवा
विश्राम, आत्मशक्तीला.
असावे स्वस्थ चित्त.
शंका, संशय, सोडावा.
अभावाचा नसावा वारा.
ही तर शिवलीला. की
वाचतात. शरीर त्रासाला
अजून आहे सांसारिक
कर्तव्याला. माता पुत्र
कन्या अर्धांगीला.

असो, द्यावे सावधपण व्यवहार
नाते संबंधांचा.



फुले, पाने, माला, पाट व पुजा सामुग्री - अभयमुद्रा व कृपाशीर्वाद

# त्र्यंबकेश्वरची हकीकत पहिली भेट

29 May 06 त्र्यंबकेश्वर-

आळास माझ्या स्थानी पडोन दोन कानी
मागणे असे लेखन सुरक्षित. प्रसाद असे तो
सहज न द्यावा कोणा. असा खंड पडणार.
मागणे येईल फळाला. परतोनी येशी पुढल्या
वर्षाला- माझ्या शिष्याचा ज्ञानेशाचा - मिळेल
कृपाशीर्वाद प्रेमाचा.



10 Dec 2006. SUNDAY - कालसर्प विधि-



ॐ धन्य धन्य तो देह असे पूर्व संचित
त्यात पिता माता - पुत्र सुता पुण्यशील.
सुकांता अनेक जन्मींच्या. सद्गुरू धरोन
बोट वाट दावी.
पसायदानी करावे मनन. सावधपणे शोधावे
मार्ग पुढचे. हाती येता योग्यांचा साठा. न
सावा अहंभाव खोटा. शिवास नमावे प्रेम भावे
फिरून भेटी आळंदीस. करण्या लिखाण पुढचे
करी सांत्वन इतरांचे घेऊन आशिष मेहेरांचे.

**आळास माझिया स्थानी प(क)डोन दोन कानी मागणे असे लेखन सुरळित. प्रसाद असे तो सहज न द्यावा कोणा. असा खंड पडणार.**
**मागणे येईल फळाला. परतोनी येशी पुढल्या वर्षाला. माझ्या शिष्याचा - ज्ञानेशाचा- मिळेल कृपाशीर्वाद प्रेमाचा.**

लाल चौकोनात- नदी, मंदिर, ऑटोरायटिंग कागद, नाडीताड पट्टी, अभयमुद्रा व फुलाचा कृपाशीर्वाद.

धन्य धन्य तो देह असे पूर्व संचित। त्यात पिता माता - पुत्र सुता पुण्यशील सुकांता अनेक जन्मींच्या. सद्गुरू धरोन बोट दावी. पसायदानी करावे मनन. सावधपणे शोधावे मार्ग पुढचे. हाती येता योग्यांचा साठा. नसावा अहंकार खोटा,शिवास नमावे प्रेम भावे।फिरून भेटी आळंदीस. करण्यालिखाण पुढचे. करी सांत्वन इतरांचे घेऊन आशिष मेहेरांचे. कालसर्प योग आहे. म्हणून मुलाच्या विवाहाचे योग येत नाहीत. यावर उपाय म्हणून त्र्यंबकेश्वर येथे तो विधी करायला गेलो होतो...

अभयमुद्रा व फुलाचा कृपाशीर्वाद.

# त्र्यंबकेश्वरची हकीकत


त्र्यंबकेश्वर मंदिर


संत निवृत्तीनाथांची समाधी





29 May 06 त्र्यंबकेश्वर -

आळास माझ्या स्थानी पडोन दोन कानी
मागणे असे लेखन सुरक्षित. प्रसाद असे तो
सहज न द्यावा कोणा. असा खंड पडणार.
मागणे येईल फळाला. परतोनी येशी पुढल्या
वर्षाला माझ्या शिष्याचा ज्ञानेशाचा - मिळेल
कृपाशीर्वाद प्रेमाचा.

# त्र्यंबकेश्वर दि 16 ऑगस्ट 2013




- घन वर्षा सुदिनाची प्रेमे घ्यावी शरीरी।
- या यंत्रे करविशी कासे कामनेची।।
- ओष्ठी बोल धन्यतेचे। करे नमनाने सुखविशी।।
- सदा सर्वकाळ ध्यायशी। गुरुमुनि जनांशी।।
- श्रावणमासी तव जन्मतिथी दिनी नव जीव।
- सुचवले। खुणविले गूढशब्दे।।।
- सार्थकता घडेल या जीवनांती। करी पकडून शिवपुत्र।
- पेटवी शरशती दीप-
- अमित आभा उजळेल निष्चयाने।
- मनोनिग्रही असावि लोकोपयोगी सेवा करता
- कार्यक्षम भेटवली अगस्त्यादिक सुचकतेने
- **गौतमी तटाकी – त्र्यंबक महेश – चंद्रगंगा शीखेष बोलवी निवृत्तीमुखे**

# एक वर्षांनी पुन्हा त्र्यंबकेश्वरला 25 एप्रिल 2007

**आयुष्याच्या चवथ्याभागी घडे आत्मसिद्धीचा प्रकाश. आरंभ त्याचा जाहला.**
**साधणे हरिकाम मन करून निरपेक्ष. असे द्यावे साक्षीभावाने सहज समाधीत.**
**महात्म्यांचे असे पाठबळकरवून घेतील लोकोपयोग तुझिया जिवाचा**
**प्रसाददाना ज्ञानिया आतूर जाई वेगे त्याचे स्थानी**

बोलाविले याच साठी या स्थानी सावध कराया
स्थान मानाचे पावून साधावे हित भविष्य कथनाचे. पाया भरावा नव्या कार्याचा वेदत्रय नामासाठी
असे हा आदेश करुन मन निशंक साधावा आत्मोद्धार स्वहिताचा

**अभयमुद्रा व अन्य चित्रे. वेद त्रय म्हणजे निलेश त्रिवेदी.यांनी त्यांच्या कंपनीत मला ऑनररी AVP पद दिले होते.**